मागणी क्र. डी-५ मुख्यलेखाशिर्ष २४०४ "दूध - अनुदानाकरीता" सन २०१९-२० मधील मंजूर पुरवणी मागणीचे निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पूरक २०१९/प्र.क्र.१०२/पदुम-८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. १३ फेब्रुवारी, २०२०

वाचा:- १) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. लवेसु १८/प्र.क्र.८/पदुम- ८ दि.२०/०७/२०१८,३१/०७/२०१८ व दि. २१/०८/२०१८
२) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. लवेसु १८/प्र.क्र.८/पदुम- ८ दि.१७/११/२०१८ व दि. ०८/०३/२०१९
३) वित्त विभाग परिपत्रक क्र पूरक २०१९/प्र.क्र.३६/अर्थ-३, दि. ०९/०७/२०१९
४) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.पूरक-२०१९/प्र.क्र.३६/पदुम-१६,दि.२६/७/२०१९

**प्रस्तावना -**

संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयानुसार राज्यातील दूध भूकटी व द्रवरुप दुधाची निर्यात करण्यासाठी सहकारी व खाजगी दूध भूकटी प्रकल्पांना अनुक्रमे रु. ५०/- प्रती किलो आणि रु.५/- प्रती लिटर प्रोत्साहनपर अनुदान आणि राज्यातील उत्पादित होणारे पिशवीबंद दूध वगळून उर्वरित गाय दुधाच्या रुपांतरणास रु. ५/- प्रती लिटर अनुदान विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यास शासन मान्यता देण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये फेब्रुवारी ते एप्रिल, २०१९ या कालावधीकरीता रु.३/- प्रति लिटर इतके अनुदान मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात आली. प्रोत्साहनपर अनुदानाचा खर्च भागविण्यासाठी जून,२०१९ च्या पावसाळी अधिवेशनात रु.१४२५२.१६ लक्ष रकमेची पूरक मागणी मंजूर करण्यात आली असून त्यापैकी रु.११४०१.७२ लक्ष इतकी रक्कम संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आली आहे. सदर रु. १४२५२.१६ पैकी रु.२८५०.४४ लाख इतकी रक्कम वितरित करणे बाकी आहे. तसेच डिसेंबर, २०१८ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये रु. १००.०० कोटी इतक्या रकमेची पूरक मागणी मंजूर करण्यात आली आहे. त्यानुसार सदर रु. १००.०० कोटी व रु. १४२.५२१६ कोटी पैकी उर्वरित रु. २८.५० कोटी असे एकूण रु.१२८.५० कोटी इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये गाय दूधाच्या रुपांतरणासाठी मंजूर रु. ५/- व रु.३/- प्रति लिटर इतक्या प्रोत्साहनपर अनुदानासाठी विधानमंडळाच्या जून,२०१९ व डिसेंबर, २०१९ च्या अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला निधी खालीलप्रमाणे वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु.हजारात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष | मंजूर पूरक मागणी | याआधी वितरित करण्यात आलेला निधी | शिल्लक/वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| १ | मागणी क्र. डी-५,<br>२४०४ दुग्धव्यवसाय विकास,<br>२०२, शासकीय दूध योजना पुणे, प्रापण (अनिवार्य)<br>(२४०४ ०८०४), २९-दूध खरेदी | १४२५२१६ | ११४०१७२ | २८५०४४ |
| २ | मागणी क्र. डी-५,<br>२४०४ दुग्धव्यवसाय विकास,<br>००<br>१०२, दुग्धव्यवसाय प्रकल्प<br>(०५) दूध व दूध भुकटी करिता अनुदान<br>(०५) (०१)- अतिरिक्त दूधाचे रुपांतर व निर्यात करिता अनुदान<br>३३-अर्थसहाय्य<br>(२४०४११११) | १०००००० | -- | १०००००० |
| | **एकूण** | **२४२५३१६** | **११४०१७२** | **१२८५०४४** |

या प्रकरणी आयुक्त दुग्धव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच वरील कोष्टकातील अनुक्रमांक १ व २ येथील निधीकरीता अनुक्रमे दुग्धशाळा व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य, पुणे व उप आयुक्त (प्रक्रिया व वितरण), दुगधव्यवसाय विभाग व दुग्धशाळा व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

वित्त विभागाच्या अनौसं क्र.२२/२०२०/व्यय-२ दि. ३०/१/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१३१३१२१७८८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Rajesh Shaligram Govil

Digitally signed by Rajesh Shaligram Govil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, serialNumber=3cec7a5cf8d124a0d8e15bfc85a782c01ef27eaee8bedaba4dce3416562097ac, cn=Rajesh Shaligram Govil
Date: 2020.02.13 13:12:37 +05'30'

**( राजेश गोविल )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय्य सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) मा.प्रधान सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य,वरळी, मुंबई
८) उपसचिव (दुग्धव्यवसाय),कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा अनुज्ञयता व लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
१०) अधिदान व लेखाधिकारी, बांद्रा, मुंबई
११) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१२) सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी
१३) सर्व जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी
१४) सर्व शासकीय दूध योजना
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६) वित्त विभाग (व्यय-२,अर्थसंकल्प-१५),मंत्रालय, मुंबई
१७) कक्ष अधिकारी (पदुम-१६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) निवडनस्ती-पदुम-८.